<u>निवडसूची सन २०१३-१४</u>

**पोलीस अधीक्षक / पोलीस उप आयुक्त (असंवर्ग) संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना...**

# महाराष्ट्र शासन

**गृह विभाग**

**शासन आदेश क्र: रापोसे-१७१४/प्र.क्र.१४५/पोल-१अ,**

**गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय,**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मुंबई-४०००३२**

**दिनांक :- १६ जून, २०१५.**

**<u>संदर्भ</u> :-** पोलीस आस्थापना मंडळ क्र. १ ची दिनांक ५.०६.२०१५ रोजीची बैठक.

**शासन आदेश -**

पोलीस अधीक्षक / पोलीस उप आयुक्त (असंवर्ग) या पदावर पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सन २०१३-१४ च्या तदर्थ पदोन्तीसूची मध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या पोलीस उप अधीक्षक / सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) संवर्गातील खालील अधिकाऱ्याची ७ वर्षाची नियमित सेवा पूर्ण होत नसल्याने, त्यांची निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सध्याची नेमणूक | पदोन्नतीवरील पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री. वैभव कलुबर्मे | पोलीस उप अधीक्षक, राज्य पोलीस नियंत्रण कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | पोलीस अधिक्षक, नागरी हक्क संरक्षण, नागपूर. |

२. उपरोक्त अधिकाऱ्याविरूध्द विभागीय / संक्षिप्त / प्राथमिक चौकशी / न्यायालयीन कार्यवाही प्रलंबित किंवा प्रस्तावित असल्यास सामान्य प्रशासन विभागाच्या दि. २.०४.१९७६ च्या परिपत्रकामधील तरतुदीनुसार प्रलंबित किंवा प्रस्तावित विभागीय / संक्षिप्त / प्राथमिक चौकशीच्या / न्यायालयीन कार्यवाहीच्या अधीन राहून त्यांना तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत आहे. त्यांच्याविरूध्द प्रलंबित किंवा प्रस्तावित संक्षिप्त / प्राथमिक चौकशीअंती होणारी शिक्षा, ते पदोन्नतीच्या पदावर भोगण्यास तयार असल्याचे हमीपत्र त्यांच्याकडून घेऊनच त्यांना वरीलप्रमाणे पदोन्नतीने पदस्थापना देण्यात यावी.

३. उपरोक्त पदोन्नती मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र. ८४५२/२००४ व याचिका क्र.४७०/२००५ मधील अंतिम निर्णयाच्या तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहेत.

४. पदोन्नतीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण अथवा अन्य मा. न्यायालयाचे स्थगिती आदेश असल्यास ते विचारात घेऊन उक्त अधिकाऱ्यास पदोन्नतीने पदस्थापना देण्यात यावी.

५. उपरोक्त अधिकाऱ्यास पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्यासाठी सध्याच्या पदावरून तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. तसेच त्यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करू नये.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०६१६१६११३२७६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Charushila Chandrakant Tambekar

Digitally signed by Charushila Chandrakant Tambekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2b0496c0c213a3f50c6522cc39ae5de95e1150ac3287e89c21b1422e313820a2, cn=Charushila Chandrakant Tambekar
Date: 2015.06.16 16:52:40 +05'30'

**(चारूशीला तांबेकर)**

सह सचिव, गृह विभाग

**प्रति,**

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

**प्रतिलिपि,**

१) महालेखापाल - १/२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२) मा. मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. राज्यमंत्री, गृह (शहरे/ग्रामिण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) पोलीस आयुक्त, नागपूर,
५) अपर पोलीस महासंचालक, नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६) पोलीस अधीक्षक, नागपूर ग्रामिण,

७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

८) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,

९) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,

१०) सामान्य प्रशासन विभाग (कार्या.१२), मंत्रालय, मुंबई,

११) संबंधित अधिकारी (पोलीस महासंचालक यांचेमार्फत),

१२) निवडनस्ती (कार्यासन पोल-१अ).